**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील सह संचालक,गट-अ (राजपत्रित) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन आदेश क्र.औसुवआ-०४२४/प्र.क्र.५५/कामगार-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक- १५ एप्रिल, २०२५.

<u>वाचा-</u>

१.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१

२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः दिव्यांग २०२२/प्र.क्र.८३/१६-अ, दि.२०.०४.२०२३

३.सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.२१.०६.२०२१

**<u>शासन आदेश:-</u>**

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील **उप संचालक,गट-अ**, (राजपत्रित) (वेतनस्तर एस-२०,रु.५६१००-१७७५००) या संवर्गातील सेवाजेष्ठतेनुसार खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यास **सह संचालक,गट-अ** (राजपत्रित) (वेतनस्तर एस-२३, रु.६७७००-२०८७००) या पदावर पदोन्नती देण्याबाबत **सन २०२४-२५** च्या निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने दि.७/१/२०२५ च्या टिप्पणीअन्वये मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरून खालील तक्यात नमूद संबंधित अधिका-याच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या पदावर, त्यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **जेष्ठता क्रमांक** | **अधिकाऱ्याचे नांव व सध्याच्या पदस्थापनेचे ठिकाण** | **प्रवर्ग** | **पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण** | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री.ज.पं.मोहरकर,उप संचालक, गट-अ, अपर संचालक, औसुवआ, नागपूर | इ.मा.व | सह संचालक,गट-अ औसुवआ, मुंबई | सेवाजेष्ठतेनुसार पात्र |

२. वरील नमूद अधिकाऱ्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहुन सह संचालक,गट-अ या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४

स्थितसेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दि ०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयाप्रकरणी मा उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहुन सदर सहमती देण्यात येत आहे

२) सदर सह संचालक,गट-अ या पदावरील पदोन्नत उक्त अधिका-यास त्याच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून, या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील व पदोन्नतीसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसंदर्भात या विभागाच्या दि.१२.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

४. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उपरोक्त अधिकाऱ्यास संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी विहीत मुदतीत कार्यमुक्त करावे, तसेच पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाल्याचा अहवाल संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यानी संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनाधिकृतपणे रजेवर जाऊ नये. पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसेच केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०१५ मधील २ (ड) येथील तरतुदीनुसार आणि उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील नमूद अधिसूचनेतील नियम क्र. १३ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या तारखेपासून **३० दिवसांच्या** विहीत मुदतीत रूजू होणे आवश्यक राहील सदर मुदतीत रुजू नझाल्यास संबंधित अधिकाऱ्यांचा अनुपस्थितीचा कालावधी **अकार्यदीन** (dies non) म्हणून गणला जाईल.

६. श्री.मोहरकर यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास, त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१५१७४०१९६८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2025.04.15 17:41:36 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**श्री.ज.पं.मोहरकर,उप संचालक,गट-अ,**
अपर संचालक,औसुवआ,नागपूर.
(**द्वारा:**-संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.

**प्रत:-**

मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई-५१.
सह सचिव, कार्यासन-१२सामान्य प्रशासन विभाग, ,मंत्रालय, मुंबई-३२.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती (काम.१)